आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ करीता शासकीय आश्रमशाळा इमारती बांधणे (ओटिएसपी) लेखाशीर्ष (४२२५ १११८) अंतर्गत निधी वितरण

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/ प्र.क्र.१०७ /कार्यासन.६**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
**दिनांक : ३१ मार्च, २०२२**

वाचा

१) शासन निर्णय वित्त विभाग,क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ दि.२४.०६.२०२१,दि.१४.१०.२०२, दि.२८.०२.२०२२ ,दि.१७.०३.२०२२ व दि.२८.०३.२०२२.
२) शासन निर्णय क्र. बीयुडी-२०२१/प्र.क्र.१०७/कार्यासन.६ दि.१३.१०.२०२१ व दि.१४.०२.२०२२
३) अधिक्षक अभियंता नाशिक,सार्वजनिक बांधकाम (आदिवासी मंडळ) यांचा निधी मागणी प्रस्ताव

**प्रस्तावना-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या वर्षाकरीता मागणी क्रमांक टी-६ मुख्य लेखाशिर्ष ४२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांच्या कल्याणावरील भांडवली खर्च, ०२ अनुसूचित जमातीचे कल्याण, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, अंतर्गत (०२) (०६) आश्रमशाळेच्या इमारती बांधकाम करणे (ओटिएसपी) (४२२५ १११८), ५३- मोठी बांधकामे या लेखाशीर्षाखाली रु.२५००.०० लाख इतकी तरतुद अर्थसंकल्पीत असुन सुधारित अंदाजामध्ये रु.२५००.०० लाख तरतुद मंजुर आहे. यापुर्वी वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या मर्यादेत संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयांन्वये निधी वितरीत करण्यात आला होता. आता वित्त विभागाने संदर्भाधीन क्र.३ येथील प्रस्तावास अनुसरुन वाढीव उपलब्ध करुन दिलेला निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

शासकीय आश्रमशाळा बांधकाम (ओटिएसपी) (लेखाशीर्ष ४२२५ १११८) या अंतर्गत बाब क्र. ५३- मोठी बांधकामे या खाली सन २०२१-२२ या वर्षातील अर्थसंकल्पीय तरतुदीतून रु.६२५.०० लाख (अक्षरी रुपये सहा कोटी पंचवीस लाख फक्त) इतका निधी खालीलप्रमाणे नियंत्रक अधिकारी तथा अधिक्षक अभियंता सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) मंडळ यांना वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**(रु. लाखात)**

| अ.क्र | नियंत्रक अधिकारी | कामांची संख्या | सदर शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** |
| १ | अधीक्षक अभियंता सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) मंडळ , नाशिक. | ३ | **६२५.००** |
| **एकुण** | | **३** | **६२५.००** |

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (BEAMS )वर वितरीत करण्यात येत असुन सदर निधी सोबत जोडलेल्या विवरणपत्रात नमुद केल्यानुसार एकूण **३ कामांवर** रकाना ५ मध्ये नमुद केलेल्या मर्यादेत खर्च करण्यात यावा.

३. सदर निधीचे वितरण खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे.

१) संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी अर्थसंकल्पीय प्रकाशन परिशिष्ट -ड मध्ये समाविष्ट असलेल्या कामांवरच खर्च करण्याबाबत तसेच प्रशासकीय मान्यतेच्या/सुधारित प्रशासकीय मर्यादेतच खर्च करण्याबाबत दक्षता घ्यावी.

२) सोबतच्या विवरणपत्रात नमुद केलेल्या **३** कामांवरच सदरील निधी खर्च होईल याची दक्षता संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी घ्यावी.

३) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) मंडळ,**नाशिक** यांचे मार्फत सदर बांधकामांना वेळोवेळी भेटी देण्यात येवून कामाचा दर्जा, गुणवत्ता यांची तपासणी करावी व वितरीत करण्यात आलेला निधी योग्य रित्या खर्च होत आहे याची दक्षता घ्यावी.

४) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी मंडळ) नाशिक यांचे मार्फत प्राप्त मागणीस अनुसरुन निधी वितरीत करण्यात येत असुन सदर निधी दि.३१ मार्च, २०२२ अखेर खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

५) सदर वितरीत निधीमधुन झालेल्या खर्चाचा अहवाल नियंत्रक अधिकारी यांनी एकत्रित करुन तो विहित प्रपत्रात शासनास सादर करावा.

६) वित्त विभागाच्या वेळोवेळी निर्गमित शासन परिपत्रकामधील विहित केलेल्या अटी व शर्तीचे पालन करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी यांची राहील.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. /व्यय-१४ दि. .०३.२०२२ च्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३११६२२४०७८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.03.31 17:48:25 +05'30'

( रविंद्र दि.औटे)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.मंत्री, आदिवासी विकास, यांचे खाजगी सचिव , मंत्रालय, मुंबई..
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव आदिवासी विकास, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६. मुख्य अभियंता, बांधकाम व्यवस्थापन कक्ष, आदिवासी विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.
७. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
८. प्रकल्प अधिकारी, ए.आ.वि.प्र, राजुर,तळोदा, नंदुरबार,
९. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) मंडळ,नाशिक.
१०. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी) विभाग, धुळे.
११. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई.
१२. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
१३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, धुळे /चंद्रपुर.
१५. वित्त विभाग (व्यय १४/अर्थ-१९), मंत्रालय, मुंबई-३२
१६. कार्यासन अधिकारी (का-२) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१६.निवड नस्ती (का-६) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

| शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/ प्र.क्र.१०७/कार्यासन.६,दि. ३१/०३/२०२२ सोबतचे विवरणपत्र. | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | (रु.लाखात) |
| अ.क्र. | कामाचे नाव | प्र.मा. किंमत | यापुर्वीचा खर्च | सदर शा.नि.अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| **कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (आदिवासी विभाग), धुळे** | | | | |
| १ | शासकीय आश्रमशाळा भालेर येथे मुलांचे वसतीगृह बांधकाम करणे ता.जि.नंदुरबार | १४०७.९० | ९७१.४५ | १२०.०० |
| २ | शासकीय आश्रमशाळा भालेर येथे मुलींचे वसतीगृह बांधकाम करणे ता.जि.नंदुरबार | १४०७.९० | ८८०.८६ | ११५.०० |
| ३ | शासकीय आश्रमशाळा जवळेवाळेश्वर येथे मुलींचे वसतीगृह बांधणे ता. अकोले जि अहमदनगर | ९१७.७१ | ५२७.४० | ३९०.०० |
| **३** | **धुळे विभाग एकुण** | **३७३३.५१** | **२३७९.७१** | **६२५.००** |
| | **अधिक्षक अभियंता,सार्व.बांधकाम नाशिक मंडळ एकुण** | **३७३३.५१** | **२३७९.७१** | **६२५.००** |

RAVINDRA
D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108,
pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613,
serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.03.31 17:49:04 +05'30'